स्थायी अग्रिम रक्कमेत वाढ करणेबाबत.
सह्याद्री व नंदगिरी राज्य अतिथीगृह

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः-अग्रिम-१६२३/प्र.क.२३/राशि-२,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: -१९ जून, २०२४.

**वाचा:-**१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.मआख-२०११/प्र.क्र.१९/२०११/विनियम, दि.०८ मे, २०१४.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन, क्र.संकिर्ण-१०१३/प्र.क्र.८३/३१, दि.०९.०४.२०१४.

**शासन निर्णयः-**

सामान्य प्रशासन विभागातील राजशिष्टाचार उपविभागाच्या अधिपत्याखाली सह्याद्री व नंदगिरी ही २ राज्य अतिथिगृहे आहेत. या दोन्ही अतिथीगृहात विशेष-अति महत्वाच्या (VVIP) मान्यवरांची निवास व भोजनाची सोय करण्यात येते. यात सर्वोच्च न्यायालयाचे मुख्य न्यायाधीश/ न्यायाधीश, अन्य राज्याचे मुख्यमंत्री, राज्यपाल, अन्य राज्याच्या उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायमुर्ती, केंद्रीय मंत्री/राज्यमंत्री, केंद्रीय निवडणूक आयोगाचे आयुक्त, केंद्रीय लोकसेवा आयोगाचे अध्यक्ष अशा मान्यवरांचा समावेश आहे. तसेच सदर मान्यवरांच्या निवास व भोजनाबरोबरच राज्यमंत्री मंडळाच्या बैठका, केंद्रीय मंत्र्यांसमवेतच्या बैठका, मा.मुख्यमंत्री/उपमुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांनी आयोजित केलेल्या बैठका, राज्य शासनाचे विविध आयोग/महामंडळे यांनी आयोजित केलेल्या बैठका, विविध परिषदा सेमिनार, मा.उच्च न्यायालयाच्या न्यायमूर्तीच्या उपस्थितीत होणारे कार्यक्रम अशा महत्त्वाच्या बैठका/कार्यक्रम सह्याद्री राज्य अतिथिगृहात होत असतात. येणाऱ्या मान्यवरांचे भोजन व वरीलप्रमाणे आयोजित बैठका /कार्यक्रम यावेळी दयावयाचे चहापान, अल्पोपहार व भोजन यांच्या व्यवस्थेसाठी व्यवस्थापक यांना बहुतेक वेळा ऐनवेळी मोठ्याप्रमाणावर वस्तू बाजारातून खरेदी कराव्या लागतात. याकरिता दि.०९.०४.२०१४ च्या ज्ञापनान्वये स्थायी अग्रिमात वाढ करण्यात आली होती.

२. परंतु बैठकांचे प्रमाण वाढले असून, बाजारातील वस्तुंच्या किंमतीदेखील वाढल्या असल्याने स्थायी अग्रीम अपूरा पडत आहे. सबब, दि.०१.०६.२०२४ पासनू सह्याद्री राज्य अतिथीगृहासाठीचा स्थायी अग्रिम रु.५,००,०००/- (रुपये पाच लक्ष फक्त) वरुन रु.८,००,०००/-(रुपये आठ लक्ष फक्त) इतका व नंदगिरी राज्य अतिथी गृहासाठीचा स्थायी अग्रिम रु.५०,०००/- (रुपये पन्नास हजार फक्त) वरुन रु.१,५०,०००/-(रुपये एक लक्ष पन्नास हजार फक्त) इतका करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर खर्च "२०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (०९०) सचिवालय (००) (०२), सामान्य प्रशासन विभाग, राजशिष्टाचार, १३-कार्यालयीन खर्च, मागणी क्र.ए-४, सांकेतांक क्र.२०५२ ०३२१" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ चे उपविभाग १५ मधील नियम ५६ च्या तरतुदी व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-१, उपविभाग २ मधील नियम क्र.५६ मधील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार व महालेखापाल कार्यालयाने पत्र क्र. TM/ch.5/General Administration Department /UOR-24/306 दि.04.05.2024 अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१९१२३०२१४००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

AJAY MAHADEV SAKHARE

Digitally signed by AJAY MAHADEV SAKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=8551bf5940f7a6d8f106f2dd0205e9978bbd325c77d8bf280667344780ebe3e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=72E7AB3D2A7454139BED9EE5298E46008FBE5FB1F2981B96BD7E2EC94BB26F21, cn=AJAY MAHADEV SAKHARE
Date: 2024.06.19 12:48:20 +05'30'

**( अजय साखरे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (राशि-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) कक्ष अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी, राजशिष्टाचार, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) व्यवस्थापक, सह्याद्री/नंदगिरी राज्य अतिथीगृह, मुंबई.
८) सहायक व्यवस्थापक, सह्याद्री /नंदगिरी राज्य अतिथीगृह, मुंबई.
९) वित्त विभाग/व्यय-४, विनियम, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) निवडनस्ती.